**जिल्हा विकास आराखडयास मान्यता देणे व अंमलबजावणी करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्र. डीएपी-१०२३/प्र.क्र.९८/का.१४८१,**

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक १५ मार्च, २०२४.

संदर्भ:-नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.डीएपी १०२३/प्र.क्र.९८/का.१४८१, दि.२०.०४.२०२३ व दि.३१.०१.२०२४.

**प्रस्तावना:-**

विकसित भारतासाठी राज्याची अर्थव्यवस्था सन २०२८ पर्यंत १ ट्रिलियन अमेरिकन डॉलर इतके पाहोचविण्याचे राज्याचे ध्येय आहे. सदर ध्येय साध्य करण्यासाठी "बॉटम अप" दृष्टीकोन वापरुन आर्थिक वाढ व राज्याच्या सकल उत्पन्नासाठी उत्प्रेरक म्हणून जिल्हयांवर लक्ष केंद्रित करणे आवश्यक आहे. तसेच "विकासाचे केंद्र " म्हणून जिल्हयांवर लक्ष केंद्रित केल्यामुळे आर्थिक विकासासाठी विचारपूर्वक आणि विशिष्ट दृष्टीकोन विकसित करणे शक्य होईल व असा विकास सर्वसमावेशक असेल आणि शाश्वत विकास उद्दिष्ट्ये साध्य करण्यास मदतही करेल.

वरील पार्श्वभूमीवर, जिल्हा विकास आराखडा तयार करण्यासाठी राज्य शासनाकडून राज्यातील सर्व जिल्हयांना मा.मुख्य सचिवांच्या दि.२८ मार्च, २०२३ च्या पत्रान्वये मार्गदर्शक सूचना प्रसृत करण्यात आल्या आहेत. तसेच नियोजन विभाग, शासन निर्णय दि.२० एप्रिल, २०२३ व दि.३१ जानेवारी, २०२४ अन्वये जिल्हा विकास आराखडा तयार करणे व त्याला गुणात्मक सहाय्य देणे यासाठी जिल्हा व राज्य स्तरावर विविध समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. राज्यातील जिल्ह्यांनी जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेने जिल्ह्याच्या आर्थिक विकासाच्या अनुषंगाने तयार केलेल्या जिल्हा विकास आराखडयांमधील उपक्रम/प्रकल्प/ योजना यांची अंमलबजावणी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षापासून होणे अत्यंत आवश्यक आहे. यास्तव जिल्हा विकास आराखडा यांची अंमलबजावणी करण्यासंदर्भातील राज्य मंत्रिमंडळाच्या दि.११ मार्च, २०२४ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार जिल्हा विकास आराखडयांना वार्षिक कृती आराखडयासह मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील सर्व जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्यांची बलस्थाने व कमकुवत क्षेत्र, गुंतवणुकीच्या संभाव्य संधी, नियोजन विकास आराखडा, जिल्ह्याचा कृषी आराखडा, निर्यात धोरण व राज्य शासनाची विविध धोरणे तसेच जिल्ह्यातील विविध उद्योग क्षेत्रांचे प्रतिनिधी यांच्याशी विचारविनिमय करुन जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेने "जिल्हा विकास आराखडा" तयार केला आहे. सदर जिल्हा विकास आराखडयांची अंमलबजावणी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षापासून करण्यात येणार आहे.

२ मा.मंत्रिमंडळाच्या निर्णयाच्या अनुषंगाने राज्यातील सर्व जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे निदेश देण्यात येत आहेत.

१) राज्यातील सर्व जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्याचा, जिल्हा नियोजन समिती मान्यता प्राप्त पाच वर्षाकरीताचा "जिल्हा विकास आराखडा" प्रत्येक वर्षाच्या कृती आराखडा यासह शासनास सादर केलेले आहेत. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील "राज्य कार्यकारी समिती" ने छाननी अंती जिल्हा विकास आराखडयात सुचविलेले बदल/ सुधारणा याचा समावेश "जिल्हा विकास आराखडा" यात करुन त्यांच्या जिल्हयाच्या "जिल्हा विकास

आराखडा" मधील वार्षिक कृती आराखडयाची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) सन २०२४-२५ पासून जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) मधील मंजूर नियतव्ययापैकी किमान २५ टक्के निधी जिल्हा विकास आराखडा अंतर्गत वार्षिक कृती आराखडा यात निश्चित करण्यात आलेली क्षेत्रे व उप क्षेत्रे संबंधित बाबींकरीता वापरण्यात यावा.

३) जिल्हा विकास आराखडयातील वार्षिक कृती आराखडयाची अंमलबजावणी व संनियंत्रण याची कार्यवाही नियोजन विभागाच्या संदर्भाधीन दि.२० एप्रिल,२०२३ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील "राज्यस्तरीय कार्यकारी समिती" मार्फत करण्यात येईल.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१२०७५२१३१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN BHANUDAS KHEDKAR

Digitally signed by NITIN BHANUDAS KHEDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=99977b58556463dbb2db463cec9482d13f7661ed3b2a95e83e386485fff4c21e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CFCA827F49093860DB8AA4627DA10E31F82BD40A9631D2E01EC212A473A6BCA2, cn=NITIN BHANUDAS KHEDKAR
Date: 2024.03.15 12:17:09 +05'30'

**(नितिन खेडकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
७) विभागीय आयुक्त (सर्व).
८) जिल्हाधिकारी (सर्व).
९) आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
११) नियोजन विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव.
१२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१३) उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तंचे कार्यालय, (सर्व)
१४)जिल्हा अधिक्षक, कृषी अधिकारी (सर्व).
१५)महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व).
१६) निवासी उपजिल्हाधिकारी (सर्व).
१७)जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व).
१८) उपसंचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालय (सर्व).
१९) निवडनस्ती (का-१४८१).